**उप अभियंता (स्था.) यांची बदली/पदस्थापना**
**श्री. अजय वसंत चौरे**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश, क्रमांकः एलटीएस-२०२३/ प्र.क्र.१२६ /सेवा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २६/०७/२०२३

## शासन आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्य पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४(४) (दोन) आणि कलम ४ (५) मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत कार्यरत असलेल्या श्री. अजय वसंत चौरे, उप अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, सिंधुदूर्ग, कार्यालय कुडाळ यांची उप अभियंता तथा कार्यासन अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई या पदावर विनंती बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.

२. संबंधित नियंत्रण अधिका-यांना कळविण्यात येते की, श्री. अजय चौरे, उप अभियंता यांना नवीन नियुक्तीच्या ठिकाणी कार्यभार घेता यावा म्हणून आवश्यक ती स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन तात्काळ कार्यमुक्त करावे.

३. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी पदमुक्त व पदमोचक अधिकाऱ्यांनी पदभार सोडल्याचा व स्वीकारल्याचा दिनांक त्वरीत शासनास कळवावा. विहीत कालावधीत संबंधित अधिकारी बदलीच्या ठिकाणी रुजू न झाल्यास, त्याबाबत शासनास त्वरित अवगत करण्यात यावे, जेणेकरुन संबंधितांविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई त्वरित करणे शक्य होईल. म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे रजेचे अर्ज स्वीकारु नयेत/ मंजूर करु नयेत.

४. श्री. चौरे, उप अभियंता यांची बदली त्यांच्या विनंतीनुसार करण्यात येत असल्याने त्यांना पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता देय राहणार नाही.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२३०७२६१२५१४१५५१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VINOD RAGHUNATH WASE

Digitally signed by VINOD RAGHUNATH WASE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=df6bef8bd26937bd5d30452a246c0db15ca02b16535092fd52fc15cceddee835, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=20D82D9C22981C16BCE59BF72691BBC088846FF91F3043C99EBEF452E9401817, cn=VINOD RAGHUNATH WASE
Date: 2023.07.26 12:55:26 +05'30'

**( वि. र. वसे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल -१ ( लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई

२. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग
३. मुख्य अभियंता (राष्ट्रीय महामार्ग), सार्वजनिक बांधकाम विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
४. मुख्य अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, पुणे
५. अधिदान व लेखाधिकारी/निवासी लेखापरिक्षा अधिकारी वांद्रे,मुंबई
६. जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदूर्ग
७. सह सचिव, ग्रामविकास विभाग, बांधकाम भवन, मर्झबान रोड, मुंबई
८. श्री. अजय चौरे, उप अभियंता यांना संबंधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांच्यामार्फत.
९. मा. मंत्री (सा.बां.) (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. अपर मुख्य सचिव (सा.बां.)/सचिव (रस्ते/बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय मुंबई.
११. कक्ष अधिकारी (प्रशा-२) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय मुंबई.
१२. निवडनस्ती, सार्वजनिक बांधकाम विभाग, सेवा-२.